**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास मराठी भाषा फौंन्डेशन योजना तसेच स्पर्धा परीक्षा योजनाकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः-अविवि-२०१९/प्र.क्र.१६४/का-९,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : ०२ डिसेंबर, २०१९.**

**वाचा:-** (१) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८/०७/२०१९
(२) शा. नि. अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि २०१९/ प्र.क्र. ३५/का-७, दि.२५/१०/२०१९
(३) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/म.भा.फौ/प्र.क्र.४२५/२०१९/ का.३, दिनांक १४/११/२०१९चे पत्र व सहपत्र.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयामार्फत राबविण्यात येणाऱ्या (१) मराठी भाषा फाऊंडेशन वर्ग योजनांतर्गत सन २०१९-२० करिता नियुक्त करण्यात आलेल्या १०१५ मानसेवी शिक्षकांकरिता अनुदान (२) भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व परिक्षा प्रशिक्षण केंद्र, मुंबई, नागपूर, कोल्हापूर आणि औरंगाबाद येथील आणि यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या केंद्रामध्ये प्रत्येकी १० अल्पसंख्यांक उमेदवारांना प्रवेश देऊन प्रशिक्षण देण्याकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पोलीस भरती पूर्व प्रशिक्षण योजना, मराठी भाषा फौन्डेशन योजना व स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन केंद्राकरीता सन २०१९-२० वर्षासाठी "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या या लेखाशिर्षा अंतर्गत एकूण रु. ७.०० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. तथापि, पोलीस भरती पूर्व प्रशिक्षण योजना ही सन २०१९-२० पासून शासनामार्फत राबविण्यात येत असल्यामुळे संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये पोलीस भरती पूर्व प्रशिक्षण योजनाकरिता वरील लेखाशिर्षामधून २२३५ सी २७९, ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षा अंतर्गत रु.१.५०कोटी एवढा निधी पुर्नविनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यामुळे सद्यस्थितीत मराठी भाषा फौन्डेशन योजना व स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन या दोन योजनांकरीता

आयोगाला निधी उपलब्ध करुन देण्याकरीता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षा अंतर्गत रु.५,५०,००,०००/- इतक्या निधी उपलब्ध आहे. संदर्भ क्र. १ येथील वित्त विभाग परिपत्रक दि.०८ जुलै,२०१९ अन्वये डिसेंबर,२०१९ अखेरपर्यंत ६०% निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रु.५,५०,००,०००/- इतक्या अर्थसंकल्पित निधीपैकी ६०% म्हणजेच रु.३,३०,००,०००/- ( अक्षरी रूपये तीन कोटी तीस लक्ष फक्त) इतका निधी उपरोक्त दोन्ही योजनांकरीता वितरीत करण्यासाठी उपलब्ध आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने योजनांतर्गत बाबीसाठी निधी वितरणाची मागणी केलेली आहे. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांना (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाअंतर्गत खालीलप्रमाणे निधी मंजूर करण्यात येत आहे.

| "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ. क्र.** | **तपशीलवार लेखाशिर्ष** | **सन २०१९-२० साठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान** | **सन २०१९-२० मध्ये २२३५ सी २७९, ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाकरिता पुर्नविनियोजनाद्वारे अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले.** | **उर्वरित अनुदान** | **मंजूर उर्वरित अनुदान (६०% च्या प्रमाणात )** |
| **१** | **२** | **३** | **४** | **४** | **५** |
| १ | २२३५ ए २५८ | ७,००,००,०००/- | १,५०,००,०००/- | ५,५०,००,०००/- | ३,३०,००,०००/- |
| **एकूण -रु.३,३०,००,०००/-(अक्षरी रुपये तीन कोटी तीस लक्ष फक्त)** | | | | | |

२. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग,मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोगाने उपरोक्त विवरण पत्रात दर्शविलेल्या निधीचा विनियोग विहित मर्यादेपर्यंतच

करावा. संदर्भ क्र. ३ मधील सहपत्रात नमूद संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण संचालनालय यांना मराठी भाषा फाऊंडेशन या योजनेचा सन २०१८-१९ मधील शिल्लक व अखर्चित रु. २२,८७,०००/- (रुपये बावीस लक्ष सत्याऐंशी हजार फक्त) इतका निधी शासनाच्या कोषागारात तात्काळ जमा करण्याबाबत कळविण्यात यावे. सदर निधी शासन खाती जमा केल्याची चलनाची प्रत प्राप्त झाल्यानंतर त्यांना सन २०१९-२० मधील अनुदान वितरीत करण्यात यावा. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित नमून्यात शासनास सादर करणे आवश्यक राहील. संदर्भ क्र.१ शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहीत अटी व तरतुदींचे पालन, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोगाने करावे. तसेच सदर वितरीत निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत केले जाणार नाही.

३. उपरोक्त रक्कम "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम राज्य योजनांतर्गत योजना (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग (योजनांतर्गत) (२२३५ ए २५८) (कार्यक्रमावरील खर्च), ३१सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभागक्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९ येथील अटींची व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अटींची पुर्तता होत असून प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे."

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०२१५११०९८०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2019.12.02 15:27:46 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु. सचिव,

३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,

६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,

७) संचालक, लेखा व कोषागारे

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

११) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,

१२) कक्ष अधिकारी (का. ७ ), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१३) निवडनस्ती (कार्यासन-९)